**संग्रामदुर्ग किल्ला,चाकण, ता. खेड, जि.पुणे या परिसरात उत्खनन करण्याकरीताच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यतादेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : स्मारके २०१८/प्र.क्र.१४२/सां.का.३**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०२ जानेवारी, २०१९

**वाचा :-** १) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे यांचे पत्र क्र. नि-७/ विसस /खेड /२०१८-१९ /३८२०, दि.१७.०९.२०१८
२) संचालक पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, मुंबई यांचे जा.क्र.स्मारके/ २०१८/ २६६५, दिनांक ०३ डिसेंबर, २०१८ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

संग्रामदुर्ग किल्ला, चाकण, तालुका खेड, जिल्हा पुणे हा राज्य संरक्षित किल्ला काळाच्या ओघात काही प्रमाणात क्षतीग्रस्त झाला असून किल्ल्याच्या आतील वास्तु अवशेष मलब्याखाली दबले गेले आहेत. या किल्ला परिसरातील मलबा हटवून वास्तू उघड करणे आवश्यक आहे. श्री. सुरेश नामदेव गोरे ,मा.विधानसभा सदस्य, खेड-आळंदी यांनी त्यांच्या स्थानिक विकास निधीतून संग्रामदुर्ग किल्ल्यामध्ये उत्खनन करण्यास मान्यता दिली आहे. तसेच श्री. महेश किसनराव लांडगे, मा.विधानसभा सदस्य, भोसरी व किल्लेदार फिरंगोजी नरसाळा प्रतिष्ठान यांनी सदर किल्ल्याच्या दुरुस्तीबाबत पाठपुरावा केला आहे. संग्रामदुर्ग किल्ला या स्मारकाच्या परिसरात उत्खनन करण्याकरिता उपर्निदिष्ट क्र.१ अन्वये सहाय्यक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पुणे यांनी आमदार स्थानिक विकास कार्यक्रम सन २०१८-१९ अंतर्गत रुपये ५.०० लक्ष इतका निधी मंजूर केला आहे. सदर मंजुरीच्या अनुषंगाने सहायक संचालक, पुणे यांनी रुपये ५.०० लक्ष इतक्या रक्कमेचे सविस्तर अंदाजपत्रक सन २०१८-१९ च्य राज्य दरसूचीनुसार तयार केले आहे. सदर अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती उपर्निर्दिष्ट क्र.२ अन्वये संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांनी शासनास केली आहे. त्यानुसार सदर बाब शासनाच्या विचाराधीन होती.

०२. या शासन निर्णयान्वये संग्रामदुर्ग किल्ला,चाकण, तालुका खेड, जिल्हा पुणे या परिसरात पुरातत्त्वशास्त्र संकेतानुसार उत्खनन करण्याकरीताच्या रुपये ५.०० लक्ष (रूपये पाच लक्ष फक्त ) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास उपर्निर्दिष्ट क्र.१ येथील सहायक जिल्हा नियोजन अधिकारी यांनी दिलेल्या मंजूरीच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधिच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. हा शासन निर्णय विअप्र -२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग २, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग तीन मधील अनुक्रमांक ४ मधील परिच्छेद क्र. २७(२) "अ" नुसार तसेच वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१८ / प्र.क्र.६९/ अर्थ- ३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१९०१०२१६१९२३५४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Shailesh Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2019.01.02 16:59:48 +05'30'

(शै.तु.जाधव)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.श्री.सुरेश नामदेव गोरे, मा.विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहायक.
२. मा.श्री. महेश किसनराव लांडगे, मा.विधानसभा सदस्य यांचे स्वीय सहायक.
३. जिल्हाधिकारी, पुणे.
४. संचालक , पुरातत्व व वस्तुसंग्रहालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (१ व २ लेखा व अनुज्ञेयता)मुंबई/ नागपूर.
६. महालेखाकार (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा)मुंबई.
७. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
८. जिल्हा कोषाधिकारी, पुणे.
९. सहायक जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती, पुणे.
१०.सहायक संचालक, पुरातत्व विभाग, पुणे.
११.अवर सचिव (अर्थसंकल्प) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग.
१२.निवड नस्ती, सां.का.३.